**नंदुरबार जिल्हयातील बंद असलेले दोन शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह व एक शासकीय आदिवासी मुलांचे वसतिगृह स्थलांतरीत करुन ते अन्य ठिकाणी सुरु करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- आवगृ-१३२३/प्र.क्र.१९/का.१२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दि. ०८ जून, २०२३

**वाचा** :- १) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक आवगृ-१२०४/प्र.क्र.२०/का-१२, दिनांक २१.०८.२००४
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक शावगृ-२००९/प्र.क्र.०१/का-१२, दिनांक २०.०५.२००९
३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक आवगृ-१२००/प्र.क्र.५०/का-१२, दिनांक २८.०६.२००२
४) आयुक्त, आदिवासी विकास विभाग यांचे पत्र क्रमांक शावगृ-२०२२/प्र.क्र.३२/का.६(३)/५३१, दिनांक २३.०१.२०२३
५) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नंदुरबार यांचे पत्र क्रमांक शावगृ-२०२२-२३/प्र.क्र./का.१२(३)/२२२५/२०२२/नंदुरबार, दिनांक ३१.०३.२०२२
६) आयुक्त, आदिवासी विकास विभाग यांचे पत्र क्रमांक शावगृ-२०२२/प्र.क्र.३३/का.६(३)/२८०७, दिनांक २१.०४.२०२३

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भाधिन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये अनुसूचित जमातीच्या मुलां-मुलींसाठी सन २००४-०५ या वर्षी ५४ नवीन शासकीय वसतिगृह सुरु करण्यात आली आहेत. त्यामध्ये एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नंदुरबार अंतर्गत चार मुलींचे वसतिगृह सुरु करण्यात आली आहे. तसेच संदर्भाधिन क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये ८ वसतिगृह मुला-मुलींसाठी सुरु करण्यात आली आहेत. त्यामध्ये एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नंदुरबार अंतर्गत प्रत्येकी दोन मुलांचे व मुलींचे वसतिगृह सुरु करण्यात आली आहेत. संदर्भाधिन क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये अनुसूचित जमातीच्या मुलां-मुलींसाठी सन २००२-०३ या वर्षी ५३ नवीन शासकीय वसतिगृह सुरु करण्यात आली आहेत.

२. एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नंदुरबार अंतर्गत शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह, नवागाव, ता. नवापुर, जि. नंदुरबार व शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह नटावद, ता. नंदुरबार, जि. नंदुरबार या दोन वसतिगृहांमध्ये प्रवेशित असलेल्या विद्यार्थीनी हया स्थानिक असल्याने त्या तेथील अनुदानित/शासकीय आश्रमशाळांमध्ये शिक्षण घेत होत्या. त्यामुळे सदरचे दोन वसतिगृह ही सन २०१७-१८ पासून बंद करण्यात आली आहे. त्याचप्रमाणे एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा अंतर्गत शासकीय आदिवासी मुलांचे वसतिगृह, सिसा, ता. धडगाव, जि. नंदुरबार हया वसतिगृहामध्ये प्रवेशित विद्यार्थी संख्येच्या अभावी सदरचे वसतिगृह हे दिनांक २७.०७.२०२२ पासून बंद करण्यात आले आहे.

३. खांडबारा, ता. नवापूर, जि. नंदुरबार येथे एक मुलींचे वसतिगृह मंजूर असून त्याची प्रवेश क्षमता ७५ इतकी आहे. सदर वसतिगृहामध्ये प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थीनींचे अर्ज मोठया प्रमाणात येत असून दरवर्षी वसतिगृहाची वाढीव क्षमता देऊन जवळपास १५० विद्यार्थीनींना वसतिगृहामध्ये प्रवेश देण्यात येतो. त्यामुळे शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह, नवागाव, ता. नवापुर, जि. नंदुरबार हे बंद असलेले वसतिगृह स्थलांतरीत करुन शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह खांडबारा, ता. नवापूर, जि. नंदुरबार येथे स्थलांतरीत करण्याबाबतचे विचाराधीन होते. त्याचप्रमाणे नंदुरबार येथे शिक्षण घेणाऱ्या वाढत्या विद्यार्थीनीची संख्या तसेच तेथे वाढलेल्या महाविद्यालयांची संख्या बघता शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह नटावद, ता. नंदुरबार, जि. नंदुरबार हे बंद असलेले वसतिगृह स्थलांतरीत करुन शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह, नंदुरबार, ता.जि. नंदुरबार येथे स्थलांतरीत करण्याबाबतचे विचाराधीन होते.

**<u>शासन निर्णय :-</u>**

नंदुरबार जिल्हयातील बंद असलेली दोन वसतिगृह स्थलांतरीत करुन ती खालीलप्रमाणे नव्याने सुरु करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | बंद असलेले वसतिगृहाचे नाव | मंजूर क्षमता | स्थलांतरीत करुन नव्याने सुरु करण्यात येत असलेले वसतिगृहाचे नाव |
|---|---|---|---|
| १ | शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह, नवागाव, ता. नवापूर, जि. नंदुरबार | ७५ | शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह खांडबारा, ता. नवापूर, जि. नंदुरबार |
| २ | शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह नटावद, ता. नंदुरबार, जि. नंदुरबार | ७५ | शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह, नंदुरबार, ता.जि. नंदुरबार |

२. शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह नटावद, ता. नंदुरबार, जि. नंदुरबार हे वसतिगृह ग्रामीणस्तरावर असल्याने स्थलांतरा नंतरचा स्तर बदलून सदर वसतीगृह जिल्हास्तर असा होत असल्याने वसतिगृहास लागणाऱ्या सोयी सुविधा मध्ये बदल होणार आहे. सबब, सदर वसतिगृहाच्या वाढीव खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. संदर्भांकित शासन निर्णय क्रमांक १, २ व ३ वरील शासन निर्णयातील उर्वरीत इतर सर्व बाबी कायम राहतील व त्याची काटेकोरपणे अमंलबजावणी करण्यात यावी. शासनाकडून मंजूर करण्यात आलेल्या शासकीय वसतिगृहांच्या ठिकाणांमध्ये योग्य ते बदल करुन सदर यादी अद्यावत करण्याची कार्यवाही आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक यांचेकडून करण्यात यावी.

४. यासाठी येणारा खर्च “मागणी क्रमांक - टी-४, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - जनजाती क्षेत्र उपयोजना -०२-अनुसूचित जमातीचे कल्याण-२७७-शिक्षण (एक)-मागासवर्गीय मुलामुलींसाठी शासकीय वसतीगृहे सुरु करणे व त्यांचे परिरक्षण -(ए)-राज्य योजना (२२२५ १५५३)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६०९११०७४०४७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LALITKUMAR RANGNATH DHAYGUDE

Digitally signed by LALITKUMAR RANGNATH DHAYGUDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=77ee43feb646b7ae43865425ca1d67a75cd7607faeae62a4e9bad488155d6d28, pseudonym=382FCFC4319A6AF034FC5733F21801A5E2FA0EB1, serialNumber=84E88A84C7D5FA8833BA5D3A151CAF394D94599C220A07BDD761A398EED0AC3E, cn=LALITKUMAR RANGNATH DHAYGUDE
Date: 2023.06.09 11:09:59 +05'30'

**( ललीतकुमार धायगुडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
५. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नंदुरबार / तळोदा
६. गृहपाल, आदिवासी मुला-मुलींचे शासकीय वसतीगृह (प्रकल्प अधिकारी यांचे मार्फत)
७. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षा), मुंबई /नागपूर
८. निवड नस्ती का-१२.